**कार्य आयोजना यंत्रणेचे बळकटीकरण या योजनेत्तर योजनेतील ७७ अस्थायी पदांना सन २०२०-२०२१ मध्ये मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- टिआरएस-०२/२०२०/प्र.क.४३/फ-६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ३१ मार्च, २०२०

**वाचा:-** १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.टिआरएस-०३/२०१९/प्र.क्र.४३/फ-६, दिनांक १६.३.२०१९
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.टिआरएस-०३/२०१९/प्र.क्र.४३/फ-६, दिनांक १६.१०.२०१९
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष ३/योजनेत्तर/प्र.क्र.११/१९-२०/१७६५, दिनांक १८.२.२०२०
४) शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.१२.२.२०२०

**शासन निर्णय :-**

"कार्य आयोजना यंत्रणेचे बळकटीकरण" या योजनेत्तर योजनेतील सोबतच्या विवरणपत्रातील ७८ पदांना सन २०१९-२० मध्ये संदर्भ क्र.२ येथील दिनांक १६.१०.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १.१०.२०१९ ते दिनांक २९.२.२०२० पर्यत मुदतवाढ देण्यात आली होती. सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या ७७ पदांना संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.४ येथील नमूद शासन निर्णयावरील सूचनास अनुसरुन सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील ७७ अस्थायी पदांना दिनांक १.३.२०२० ते ३०.८.२०२० पर्यत पुढे चालू ठेवण्यासाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे. या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०२०-२०२१ या वित्तिय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| प्रधान शीर्ष | - | २४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| उप प्रधानशीर्ष | - | ०१ वनीकरण, |
| गौण शीर्ष | - | १०१ वनसंधारण, विकास व पुनर्निर्मिती |
| उप गौण शीर्ष | - | (०४) (०१) कार्य आयोजनेची सुधारणा व तयारी<br>(२४०६ ०१४९) ०१ वेतन |

हा शासन निर्णय वित्त विभाग क्र.विप्रअ-१००८/प्र.क्र.७०/२००८/वितिय सुधारणा-१, दिनांक १५.५.२००९ च्या जोडपत्रातील भाग पहिला उपविभाग-३ येथील अ.क्र.४ परिच्छेद २७ (२) (क) व शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दिनांक १२.२.२०२० अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३११५३९१९२७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सोबत :- विवरणपत्र

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.31 15:42:47 +05'30'

**(सुजय दोडल)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना वृत्त, नागपूर/पुणे.
५) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक).
६) विभागीय वन अधिकारी कार्य आयोजना, नागपूर/चंद्रपूर/पुणे/डहाणू/औरंगाबाद/धुळे.
७) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) वित्त विभाग, व्यय १०, अर्थसं-४, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९) वन विभागातील सर्व कार्यासने/ ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे.
११) निवडनस्ती फ-६ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**शासन निर्णय क्रमांक :- टिआएस- ०२/२०२०/प्र.क.४३/फ-६,**

**दिनांक ३१.३.२०२० सोबतचे विवरणपत्र "अ"**

| पदनाम | पदसंख्या |
|---|---|
| मुख्य वनसंरक्षक | १ |
| उप वनसंरक्षक | ३ |
| कार्यालय अधिक्षक | १ |
| वनक्षेत्रसर्व्हेक्षक | १ |
| वनसर्व्हेक्षक | २ |
| लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ |
| लघुटंकलेखक | ३ |
| मुख्य लेखापाल | १ |
| लेखापाल | ८ |
| लिपिक नि टंकलेखक | १३ |
| वनरक्षक | २७ |
| नाईक | १ |
| शिपाई | १३ |
| चौकीदार/रखवालदार | २ |
| **एकूण** | **७७** |

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: CN = SUJAY DEORAO DODAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2020.03.31 15:43:11 +05'30'

**(सुजय दोडल)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**